**सह सचिव पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक देणेबाबत. श्री.प्र.बा.दांडेकर, उप सचिव (सेवानिवृत्त)**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः ससज्ये ११२३/प्र.क्र.०१/प्रशा-१ (का.१४ )**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २७ मे, २०२४

**वाचा :-**

१ उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन ज्ञापन क्र.विचौप्र-३८१३/प्र.क्र.१५४/उद्योग-३(२), दि.०६.०५.२०१५
२ सामान्य प्रशासन विभाग शासन आदेश क्र.उसप १३२१/प्र.क्र.५७/का.१४, दि.२०.०५.२०२१
३ सामान्य प्रशासन विभाग शासन आदेश क्र.उसप १३२१/प्र.क्र.५७/का.१४, दि.०३.०२.२०२३
४ उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन आदेश क्रमांक : इएसटी २०१९/५१२/प्र.क्र.७२/उद्योग-३, दि.१३ जुलै, २०२३

*शासन आदेश*

श्री.प्र.बा.दांडेकर, सेवानिवृत्त उप सचिव हे यापूर्वी सह सचिव पदावरील पदोन्नतीसाठीच्या सन २०१४-१५ च्या निवडसूचीवर पात्र ठरल्याची शिफारस आस्थापना मंडळ क्र.२ यांनी केली होती. तथापि, श्री.प्र.बा.दांडेकर हे उद्योग विभागात कार्यरत असताना त्यांच्याविरुध्द संदर्भाधीन क्र.२ येथील ज्ञापनान्वये म.ना.से.(शिस्त व अपील) नियम १९७९ मधील नियम ८ खाली विभागीय चौकशी सुरु करण्यात आली असल्याने, सा.प्र.वि. शासन निर्णय दि.०२.०४.१९७६ मधील तरतुदीनुसार विभागीय चौकशीचा निर्णय अंतिम होईपर्यंत श्री.प्र.बा.दांडेकर यांना सह सचिव पदावर पदोन्नती देण्यात येऊ नये असा जाणीवपूर्वक निर्णय शासन मान्यतेने घेण्यात आला होता. श्री.प्र.बा.दांडेकर हे दि.३१.०३.२०१७ रोजी नियत वयोमानानुसार शासन सेवेतून निवृत्त झाले आहेत. श्री.दांडेकर यांच्याविरुध्दची विभागीय चौकशी प्रलंबित असल्याने त्यांना सेवानिवृत्तपर्यंत सह सचिव पदावर पदोन्नती देण्यात आली नव्हती.

२. दरम्यान, सरळसेवा कक्ष अधिकारी तसेच पदोन्नत कक्ष अधिकारी यांच्या ज्येष्ठतेबाबत मा.उच्च न्यायालय यांनी रिट याचिका क्र.२९८२/२०००, २९८६/२०००, ४९५८/२००३ व ३३७४/२०११ वर दि.०६.०८.२०१८ रोजी दिलेल्या आदेशास अनुसरुन मंत्रालयीन कक्ष अधिकारी संवर्गाच्या सन १९८६ पासूनच्या, अवर सचिव संवर्गाच्या सन १९९६ पासूनच्या व उप सचिव संवर्गाच्या सन २००३ पासूनच्या निवडसूच्या सुधारीत करण्यात येऊन संदर्भाधीन क्र.२ येथील शासन आदेशान्वये कक्ष अधिकारी, अवर सचिव व उप सचिव संवर्गाच्या

ज्येष्ठता याद्या प्रसिध्द करण्यात आल्या होत्या. त्यानुषंगाने प्राप्त हरकती/सूचना आक्षेप विचारात घेऊन संदर्भाधीन क्र.३ येथील शासन आदेशान्वये, संदर्भाधीन क्र.२ च्या आदेशान्वये प्रसिध्द केलेल्या सदर संवर्गाच्या तात्पुरत्या ज्येष्ठतासूच्या अंतिम करण्यात आल्या आहेत. सदर कार्यवाहीमुळे श्री.प्र.बा.दांडेकर यांच्या कक्ष अधिकारी पदावरील ज्येष्ठता दिनांक सुधारित झाला असून परिणामस्वरुप अवर सचिव व उप सचिव पदावरील ज्येष्ठता दिनांकात बदल झाला आहे. सदर बदल पुढीलप्रमाणे आहे.

| अ. क्र. | नाव | कक्ष अधिकारी पदावरील ज्येष्ठतेचा दिनांक | | अवर सचिव पदावरील ज्येष्ठतेचा दिनांक | | उप सचिव पदावरील ज्येष्ठतेचा दिनांक | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | पूर्वीचा | सुधारित | पूर्वीचा | सुधारित | पूर्वीचा | सुधारित |
| १ | श्री.प्र.बा.दांडेकर | १७.०३.१९९२ | ०१.०४.१९९६ | ३०.०४.२००१ | ०१.१०.२००२ | २६.०७.२०१० | २७.१०.२०१२ |

श्री.प्र.बा.दांडेकर हे यापूर्वी दि.२८.०८.२०१५ रोजी प्रसिध्द केलेल्या उप सचिव संवर्गाच्या दि.०१.०१.२०१३ रोजीच्या अंतिम ज्येष्ठतासूचीतील स्थानानुसार सह सचिव पदावरील पदोन्नतीसाठीच्या सन २०१४-१५ च्या निवडसूचीवर पात्र ठरले होते. शासन परिपत्रक दि.२०.०५.२०२१ अन्वये दि.२८.०८.२०१५ रोजी प्रसिध्द केलेली उप सचिव संवर्गाची दि.०१.०१.२०१३ रोजीची अंतिम ज्येष्ठतासूची संदर्भाधीन क्र.२ येथील आदेशान्वये अधिक्रमित करण्यात आलेली आहे.

३. श्री.प्र.बा.दांडेकर, उप सचिव (से.नि.) यांच्या विरुध्दची संदर्भाधीन क्र.१ रोजीच्या ज्ञापनान्वये कार्यान्वित करण्यात आलेली विभागीय चौकशीची कार्यवाही संदर्भाधीन क्र.४ च्या शासन आदेशान्वये बंद करण्यात आली आहे. आता, दि.०३.०२.२०२३ अन्वये प्रसिध्द केलेल्या उप सचिव संवर्गाच्या अंतिम ज्येष्ठतासूचीतील स्थानानुसार श्री.प्र.बा.दांडेकर हे सह सचिव पदावरील नियमित पदोन्नतीसाठीच्या सन २०१६-१७ च्या निवडसूचीवर पात्र ठरलल्याची शिफारास आस्थापना मंडळ क्र.२ यांनी केली आहे. त्याअनुषंगाने श्री.प्र.बा.दांडेकर, उप सचिव (से.नि.) यांना दि.०१.०९.२०१६ हा सह सचिव पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक देण्यात येत आहे.

४. श्री.प्र.बा.दांडेकर यांनी त्यांच्या वेतन निश्चितीसंबंधीचा विकल्प या आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत द्यावा. अशा प्रकारचा विकल्प न दिल्यास त्यांची वेतन निश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम १९८१ मधील नियम ११ (१) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन केली जाईल.

५. श्री.प्र.बा.दांडेकर यांना सह सचिव पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक हा मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ व विशेष अनुमती याचिका क्र.२५१८१/२०१८ होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०५२७१७०३०९३५०७ हा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2024.05.27 17:16:15 +05'30'

**(वि. बा. माने)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३) अ.मु.स.(सेवा), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई
४) अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव - उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग
५) सह/उप सचिव (आस्थापना) - उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग
६) श्री.प्र.बा.दांडेकर, सेवानिवृत्त उप सचिव, (विभागामार्फत)
७) निवड नस्ती प्रशा-१ (कार्या.१४)